**भाषा सल्लागार समितीं गठीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग
शासन निर्णय, क्रमांक :-भासस-२०१०/प्र.क्र.७४/२०-ब,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००३२.
दिनांक- **२२ जून, २०१०**

**संदर्भः- शासन निर्णय,सा.प्र. विभाग, क्रमांकः-एलएनजी-१०९३/प्र.क्र.४९/९३/२०-ब,दि.४ एप्रिल, १९९७.**

**प्रस्तावनाः-**

शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा अधिकाधिक वापर करणे हे धोरण राबविण्यासाठी तसेच आवश्यक ते कोश तयार करण्यासाठी भाषा सल्लागार मंडळाची सन १९६१ मध्ये स्थापना करण्यात आली होत. सदर भाषा सल्लागार मंडळाची वेळोवेळी पुनर्रचना करण्यात येऊन मंडळ सन १९८० पर्यंत कार्यरत होते. त्यानंतर शासन व्यवहारात राजभाषा मराठीचा अधिकाधिक वापर करणे, मराठीतील शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा विकसित करणे याबाबत शासनाला सल्ला देण्यासाठी सदर मंडळाची पुनर्रचना करण्याऐवजी भाषा सल्लागार समिती स्थापन करण्याचा निर्णय संदर्भाधीन दि.४ एप्रिल, १९९७ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला. सदर समिती सन २००० पर्यंत कार्यरत होती.

भाषा संचालनालयाने प्रकाशित केलेल्या अनेक कोशांमध्ये नवीन प्रचलित शब्दांची भर घालून कोश अद्यायावत करणे, नवीन परिभाषा कोशांची उदा.आयुर्वेद, सागर विज्ञान, संगणक शास्त्र, पर्यावरण शास्त्र निर्मिती करणे, परिभाषा कोशांचे पुनर्मुद्रण, परिभाषेतील अत्यावश्यक परिष्करणे, शब्दव्युत्पत्ती, मराठी परिभाषिक संज्ञांच्या समस्या सोडविणे यासारखी कामे पार पाडण्यासाठी तसेच, महाराष्ट्र राज्याचे साधारणपणे पुढील २५ वर्षातील मराठी भाषेचे धोरण ठरविणे, भाषा अभिवृध्दीसाठी नवनवे उपाय व कार्यक्रम सुचविणे व या अनुषंगाने शासनाला मार्गदर्शन करण्यासाठी भाषा सल्लागार समितीची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

राज्याचे राजभाषा मराठीचे धोरण ठरविण्यासाठी कायमस्वरुपी भाषा सल्लागार समिती गठीत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. भाषा सल्लागार समितीचे अध्यक्ष व

सदस्य  खालील प्रमाणे असतील-

| | |
|---|---|
| १) न्या.नरेंद्र चपळगांवकर, निवृत्त न्यायाधीश | अध्यक्ष |
| २) डॉ. आ.ह.साळुंखे | सदस्य |
| ३) प्रा.दत्ता भगत | सदस्य |
| ४) श्री.सदानंद मोरे | सदस्य. |
| ५) श्री.वसंत आबाजी डहाके | सदस्य |
| ६) प्रा.रंगनाथ पाठारे | सदस्य |
| ७) प्रा.हरी नरके | सदस्य |
| ८) प्रा.विश्वनाथ शिंदे | सदस्य |
| ९) डॉ.सुर्यनारायण रणसुभे | सदस्य |
| १०) प्रा.डॉ.प्रल्हाद लुलेकर | सदस्य |
| ११) श्री.सतिश काळसेकर | सदस्य |
| १२) श्री.लक्ष्मण गायकवाड . | सदस्य |
| १३) डॉ.संजय गवाणे | सदस्य |
| १४) श्रीमती वीणा देव | सदस्य |
| १५) प्रा.लक्ष्मीकांत तांबोळी | सदस्य |
| १६)डॉ.रमेश वरखिडे | सदस्य |
| १७) डॉ.विलास खोले | सदस्य |
| १८) डॉ. माधवी वैद्य | सदस्य |
| १९) डॉ.प्रमोद गोविंदराव मुनघाटे | सदस्य |

| | |
|---|---|
| २०) डॉ.राजन गवस | सदस्य |
| २१) डॉ.श्रीकांत तिडके | सदस्य |
| २२) श्री. संजय पवार | सदस्य |
| २३) सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| २४) सचिव, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग | सदस्य |
| २५) सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग | सदस्य |
| २६) सचिव, सामान्य प्रशासन विभाग | सदस्य |
| २७) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य मुंबई, | सदस्य सचिव |

**२.** भाषा सल्लागार समितीवरील अशासकीय सदस्यांची नियुक्ती तीन वर्षाकरीता राहील. अशासकीय सदस्यांचा कार्यकाळ संपल्यानंतर नवीन अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्याचे अधिकार शासनाला राहील.

**३.** भाषा सल्लागार समितीवरील अशासकीय सदस्यांना शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक-प्रवास -१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दि.३ मार्च, २०१० नुसार प्रवास भत्ता अनुज्ञेय राहील. समितीच्या अध्यक्षांना अनुज्ञेय बैठक भत्ता, प्रवास भत्ता आणि दैनिक भत्ता यासंबंधी वित्त विभागाच्या मान्यतेनुसार विहित दराने बैठक भत्त्याची प्रतिपूर्ती अनुज्ञेय राहील.

**४.** भाषा सल्लागार समितीची कार्यकक्षा पुढीलप्रमाणे राहील-.

१) भाषा संचालनालयाने प्रकाशित केलेल्या विविध कोशांमध्ये सुधारणा व नवीन, प्रचलित शब्दांचा अंतर्भाव करुन कोश अद्ययावत करणे.

२) परिभाषा निर्मित, परिभाषा कोशांचे पुनर्मुद्रण, परिभाषेतील अत्यावश्यक परिष्करणे, शब्दव्युत्पत्ती, मराठी परिभाषिक संज्ञाच्या समस्या सोडवणे व विविध विषयांवरील भावी समित्यांना, उपसमित्यांना त्यांच्या कामात मार्गदर्शन करणे.

३) वेळोवेळी आढावा घेऊन मराठी भाषा अभिवृध्दी साठी नवनवे उपाय व कार्यक्रम आखून मार्गदर्शन करणे, मराठी भाषेचे धोरण ठरविणे.

४) भाषा सल्लागार समितीच्या बैठका महिन्यातून एकदा व्हाव्यात असे अपेक्षित असून बैठकांच्या निमित्ताने होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या मंजूर अर्थसंकल्पिय अनुदानातून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या **www.maharashtra.gov.in** या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक .२०१००६२२२०१९३१००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने.**

सही /-
**(गो.ग.आल्हाट)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

मा.राज्यपाल यांचे सचिव,
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.राज्यमंत्री, सा.प्र.वि. यांचे खाजगी सचिव,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
प्रबंधक, मुळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.(पत्राने)
प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.(पत्राने)
सचिव पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, यांचे स्वीय सहायक,
सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक,
सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे स्वीय सहायक,
सचिव, सामान्य प्रशासन विभाग व वि.चौ. अ.-१ यांचे स्वीय सहायक,
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने)
महालेखापाल, महाराष्ट्र -१, मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र -२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने.
संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
सहायक भाषा संचालक, भाषा संचालनालय, नवी मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर.
सर्व संबंधित सदस्य, (भाषा संचानालयामार्फत)

**२.** सर्व मंत्रालयीन विभागाना विनंती करण्यात येते की, सदर आदेश त्यांनी आपापल्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.

**प्रत-** निवडनस्ती साठी/संग्रहासाठी.